केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करिता Single Nodal Agency व Nodal Officer **यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१९/प्र.क्र.०८/आव्यप्र-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दि. २२ मार्च, २०२४

**वाचा:-** १) भारत सरकार, वित्त मंत्रालय, कार्यालयीन ज्ञापन F.no. १(१३) PFMS/ FCD/ २०२२, दि. २३.०३.२०२१.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण- २०२१/प्र.क्र.३५/कोषा-प्रशा-, दि. २३.०७.२०२१
३) भारत सरकार, गृह मंत्रालय, आपत्ती व्यवस्थापन विभाग पत्र क्र. १-८५/२०२३-PP (E-११६२१६) दिनांक - २६.१२.२०२३
४) भारत सरकार, गृह मंत्रालय, आपत्ती व्यवस्थापन विभाग पत्र क्र. १-८५/२०२३-PP (E-११६२१६) दिनांक - १५.०१.२०२४

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे, तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ मार्च २०१९ रोजीच्या ज्ञापनान्वये सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरून वित्त विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण विनियोग व्यवस्थापन (Public Finance Management System) (PFMS) बाबत सुधारित सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनाच्या अंमलबजावणीसाठी Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करून त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र बँक खाते उघडणे आवश्यक आहे. तसेच, सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांची समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने महसूल व वन विभागांतर्गत, आपत्ती व्यवस्थापन मदत व पुनर्वसन उपविभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांकरिता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार महसूल व वन विभागांतर्गत, आपत्ती व्यवस्थापन विभागाअंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी पुढील तक्त्यामध्ये नमूद केल्यानुसार रकाना क्र. ३ मधील योजनांकरिता रकाना क्र.४ मधील अधिकाऱ्यांची Single Nodal Agency (SNA) म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच, केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयासाठी Nodal Officer म्हणून संचालक, आपत्ती व्यवस्थापन यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | विभागाचे नाव | केंद्र पुरस्कृत योजनेचे नाव | सिंगल नोडल एजन्सी (SNA) | नोडल ऑफिसर |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) | योजना - राज्यातील चार मागास जिल्ह्यातील जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे बळकटीकरण करणे. | वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, आपत्तीव्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग | संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग |
| २ | | योजना - सेन्दाई परिषदेत आपत्ती सौम्यीकरण करण्याच्या दृष्टीने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी करणे. | | |

केंद्र पुरस्कृत योजनांकरीता दि. १ जुलै,२०२१ पासून सुधारीत कार्यपध्दतीनुसार निधी प्राप्त होत आहे. त्यामुळे उपरोक्त तक्त्यातील नियुक्त Single Nodal Agency- वित्तीय सल्लागार व सहसचिव व नोडल ऑफिसर, संचालक, आपत्ती व्यवस्थापन यांनी केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने प्राप्त होणाऱ्या निधीचे वितरण व विनियोगाबाबत केंद्र शासन व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार प्राधिकृत बँकेत खाते उघडणे व अनुषंगीक आवश्यक कार्यवाही तातडीने करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२२१६१८३८५११९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.03.22 16:34:25 +05'30'

**( हितेंद्र दुफारे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
२) वित्तीय सल्लगार तथा सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग.
३) निवडनस्ती/आव्यप्र-१.